# जॉन हेन्री

लेखक: जूलियस लेस्टर
चित्र: जेरी पिंकनी



# जॉन हेन्री

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



# जॉन हेन्री

ही कथा *जॉन हेन्री* या ऐतिहासिक दंतकथा बनून राहिलेल्या व्यक्तिची आहे. त्याच्या अदम्य साहसाचे वर्णन करण्याचा प्रयत्न यात केला आहे. या अविश्वसनीय साहसामुळेच जॉन हेन्रीच्या ऐतिहासिक अस्तित्वावर प्रश्नचिन्ह उभे केले गेले. खरंतर, त्याचे ऐतिहासिक अस्तित्व ही बाब गौण आहे. जॉन हेन्री नावाचा माणूस खरोखरच अस्तित्वात होता का, हे निश्चित सांगता येत नाही. असंख्य लोक जॉन हेन्री अस्तित्वात होता, असे मानतात. अनेकांनी हे सिद्ध करण्याचा प्रयत्नदेखील केला. जी. बी. जॉन्सनने आपले पुस्तक *'जॉन हेन्री: ट्रॅकींग डाऊन अ निग्रो लिजंड' (1929)* आणि आय. डब्ल्यू. चॅपलने आपले पुस्तक *'जॉन हेन्री' (1933)* यांमध्ये जॉन हेन्री याच्या अस्तित्वाचा ऐतिहासिक पुरावा देण्याचा प्रयत्न केला. ज्या काळात जॉन हेन्री अस्तित्वात होता असे मानले जाते, त्याच्या पन्नास वर्षांनंतर हे प्रयत्न झाले. पण कुणीही खात्रीलायक असा पुरावा देऊ शकले नाहीत. अमेरिकेत आर. ब्रॅडफोर्डच्या *'जॉन हेन्री' (1931)* या कादंबरीने जॉन हेन्रीला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

एवढे मात्र निश्चितपणे म्हणता येते की *वेस्ट व्हर्जिनिया* राज्याच्या *समर्स* प्रांतातील ॲलिगेनी पर्वतरांगांमध्ये *चेसापीक* आणि *ओहायो* या ठिकाणांना जोडणाऱ्या रेल्वेमार्गावर 1870-1873 या काळात एक मोठा बोगदा खोदण्यात आला होता. कृष्णवर्णीय लोकांचे *जॉन हेन्री* हे लोकगीत याच जागेशी संबंधीत आहे. या बोगद्याचे काम केलेल्या मजुरांमध्ये पूर्वी गुलाम असलेली एक व्यक्ती होती. या व्यक्तीचे नाव होते, जॉन हेन्री. पण हा जॉन हेन्री आणि वाफेवर चालणारे ड्रील (भोक पाडण्याचे अवजार) यांच्यात काही शर्यत झाली होती, याचे पुरावे नाहीत.

या लोकगीताच्या अनेक आवृत्त्या आहेत. या पुस्तकातील कथा याच लोकगीतांतील वर्णनांवर आधारित आहे.





तुम्ही कदाचित जॉन हेन्रीचे नाव ऐकले नसेल. जर ऐकले असेल तर त्याच्या आयुष्यातील बारीकसारीक घटनांची माहिती तुम्हाला नसेल. म्हणूनच तर मी तुम्हाला त्याची कथा सांगणार आहे.

जॉन हेन्रीचा जन्म झाला तेव्हा त्याला बघायला जंगलातून पक्षी, अस्वल, बिबळे, काळवीट, हरणे, ससे, खारी आणि एक शिंगाचा घोडा आले. सूर्यसुद्धा आपले काम संपवल्यावर निजायला जाण्याऐवजी चंद्रामागे दडून या नव्या बाळाचे दर्शन घेऊ लागला.

आईबाबांनी सर्वांना दाखवण्यासाठी बाळाला बाहेर व्ऱ्हांड्यात आणले. गोंडस बाळाला पाहून पक्षी 'उऽऽऽऽह' आणि पशु 'आऽऽऽऽह' असे आवाज करू लागले.

या 'उऽऽऽऽह' आणि 'आऽऽऽऽह' दरम्यान बाळ आईच्या कुशीतून उडी मारून जमिनीवर उतरले आणि वाढू लागले.

बाळाची वाढ होतच गेली, होतच गेली, होतच गेली. त्याचे डोके आणि खांदे व्ऱ्हांड्याचे छत फोडून बाहेर जाईपर्यंत तो वाढतच राहीला. जॉन हेन्रीला खूप गंमत वाटत होती. तो हसू लागला, एवढ्या मोठ्याने की सूर्यदेखील घाबरला. चंद्राच्या आड लपलेला सूर्य आपल्या बिछान्याकडे धावला, जिथे तो यावेळी असायला हवा होता.



पुढच्या दिवशी सकाळी सूर्योदयाच्यावेळी जॉन हेन्री जागा झाला. पण सूर्य अद्याप उगवला नव्हता. तो थकला होता म्हणून त्याने आणखी झोप घेण्याचे ठरवले. जॉन हेन्रीला हे आवडले नाही. तो आभाळाकडे पाहून मोठ्याने ओरडला, “ए सूर्या, जागा हो. मला बरीच कामं उरकायचीयत. त्यासाठी मला उजेड हवाय.”

सूर्याने जांभई दिली, तोंड धुतले, वाफ घेतली, दात घासले आणि घाईघाईत तो क्षितिजाकडे पळाला.

त्या दिवशी जॉन हेन्रीने वऱ्हांड्याची दुरुस्ती करायला त्याच्या वडिलांना मदत केली. त्याच्याचमुळे हा वऱ्हांडा आदल्या दिवशी तुटला होता. दोघांनी घरात आणखी एक भाग बनवला, एक तरणतलावही तयार केला. दुपारी जेवल्यानंतर त्याने एकरभर जमिनीवरची झाडे तोडली आणि जळणासाठी त्यांचे ओंडके कापले. एवढे काम करुनही त्याच्याकडे रात्रीच्या जेवणाआधी डुलकी काढण्यासाठी वेळ शिल्लक होता.



दुसऱ्या दिवशी जॉन हेन्री शहरात गेला. तिथे त्याची भेट उंदरासारख्या दिसणाऱ्या *फ्रेडी* नावाच्या एका अत्यंत नीच माणसाशी झाली. तो एका मोठ्या सफेद घोड्यावर स्वार होता. तो काय करत होता, माहीत आहे? तो काही नीच कृत्य करण्याचा विचार करत होता. तो एवढा नीच होता की मनात चांगला विचार आल्यावर त्याला भीती वाटत असे.

जॉन हेन्री त्याला म्हणाला, "फ्रेडी, मी तुझ्याशी पैज लावतो. चल, शर्यत लावू. तू तुझ्या घोड्यावर, मी माझ्या पायांवर. जर तू आणि तुझा घोडा जिंकले तर मी वर्षभरासाठी तुझा गुलाम होईन. जर मी जिंकलो तर तू वर्षभर चांगले वागायचेस."

उंदरासारखा दिसणारा फ्रेडी विकृतपणे हसला. "ठीक आहे, जॉन हेन्री." त्याचा आवाज स्मशानात फडफडणाऱ्या वटवाघळाच्या पंखासारखा होता.





पुढच्या दिवशी सकाळी शर्यतीच्या वाटेवर दोन्ही बाजूंना लोक गर्दी करून उभे राहिले. जॉन हेन्री तयारीत होता. उंदरासारखा दिसणारा फ्रेडी आणि त्याचा घोडासुद्धा तयारीत होते.

ढ्रो! शर्यत सुरू झाली.

माझ्या पणजोबांच्या भावाच्या चुलत भावाच्या वहिनीच्या काकांची मावशी त्यावेळी तिथे होती. ती म्हणाली की सर्वांनी उंदरासारख्या दिसणाऱ्या फ्रेडीला त्याच्या मोठ्या सफेद घोड्यावर स्वार होऊन येताना पाहिले. घोडा खूप वेगात दौडत होता.



पण जॉन हेन्री कुणालाही दिसला नाही. कारण तो इतक्या वेगाने दौडला की त्याच्या सोबत वाहाताना वाऱ्याचीसुद्धा दमछाक झाली. उंदरासारखा दिसणारा फ्रेडी सीमारेषेवर पोहोचला तेव्हा त्याला जॉन हेन्री अगोदरच सीमारेषेपार पोहोचलेला दिसला. तो एका आरामखुर्चीत बसून सोडा पित होता.

यानंतर, उंदरासारखा दिसणारा फ्रेडी सर्वांशी प्रेमाने वागू लागला. लोक त्याला प्रेमळ फ्रेडी म्हणू लागले.

जॉन हेन्रीने काही मोठे काम करण्यासाठी घरापासून दूर जायचे ठरवले. त्याने आपल्या आईवडिलांचा निरोप घेतला.

त्याचे वडील म्हणाले, “बेटा, जगात स्वत:चे अस्तित्व टिकवण्यासाठी तुझ्याकडे काहीतरी कौशल्य हवे. हे घे, ही तुझ्या आजोबांची मालमत्ता.” असे म्हणून त्यांनी जॉनला वीस-वीस पौंड वजनाचे दोन हातोडे दिले. त्यांची चार फूट लांब असलेली मूठ व्हेल माशाच्या हाडांनी बनली होती.

एक-दोन दिवसांनंतर जॉन हेन्रीला काही मजूर रस्ता बनवत असल्याचे दिसले. काम करत असताना त्यांच्या मार्गात एक विशाल खडक आला. हा खडक अत्यंत कठीण होता. त्याला पार करून पुढे जायला एका उंच माणसाला निम्मा आठवडा लागला असता.





जॉन हेन्रीने त्यांना मदतीचा हात देऊ केला.

“काही गरज नाही. आम्ही सुरुंग लावून खडक फोडू,” मजूर म्हणाले.

जॉन हेन्री गालातल्या गालात हसून म्हणाला, “तुमची मर्जी.”

मजुरांनी खडकाभोवती सुरुंग पेरून ते उडवले.

धडाम! धूम! धडाम! धूम! धडाम! धूम! धडाम! धूम! धडाम! धूम!

सुरुंग उडाल्यावर इतका कर्णकर्कश्श आवाज झाला की सर्वशक्तिमान ईश्वर स्वर्गातून खाली पाहून ओरडला, “खाली खूप कल्लोळ होतोय.” सुरुंग उडाल्यावर एवढी धूळ आणि माती उडाली की सर्वत्र काळोख झाला. चंद्राला वाटले की रात्र झाली तरी आपण झोपलो आहोत. तो घाईघाईत वेगाने बाहेर पडला आणि सूर्याला धडकला. सूर्य तेव्हा उंच पर्वत चढून दुपारकडे चालला होता.

सुरुंग उडवल्यामुळे झालेला कोलाहल थांबला तेव्हा मजूर आश्चर्यचकीत झाले. तो खडक तिथल्यातिथेच ढिम्म पडून होता. सुरुंगामुळे त्याचा लहानसा ढलपाही निघाला नव्हता.

काय करावे ते मजुरांना समजेना. इतक्यात त्यांना मागून कुणाच्यातरी हसण्याचा गडगडाट ऐकू आला. मजुरांनी वळून पाहिले. जॉन हेन्री हसत उभा होता. तो म्हणाला, “मला संधी द्या. मी काही करतो.”

“घ्या, सुरुंग जे करू शकले नाही, ते तू करणार?” मजुरांचा प्रमुख म्हणाला.

जॉन हेन्री मंदपणे हसला. “बघा तर खरं.” त्याने उजव्या हातातील हातोडा डोक्यावर गोल-गोल फिरवला. त्यामुळे हवा इतक्या जोरात वाहू लागली की झाडाची पाने गळून पडली आणि आभाळातील पक्षी खाली येऊन पडले.

टण्णssssssss!

जॉन हेन्रीने खडकावर हातोड्याचा घाव घातला. खडक थरथरला, कडाक्याच्या थंडीत सकाळी शाळेची बस येणार नाही हे कळल्यावर तुम्ही कसे कुडकुडता, अगदी तसेच.

टण्णssssssss!

खडक पुन्हा थरथरला. गुलामांना मुक्ती मिळाली ती सकाळ कशी थरथरली, तसाच.

जॉन हेन्रीने दुसरा हातोडा डाव्या हातात घेतला. मग एकामागोमाग दोन्ही हातोडे तो वेगाने डोक्यावर गोल-गोल फिरवू लागला. मध्येच, उजव्या हातातील हातोड्याचा घाव त्याने खडकावर घातला. टण्णssssssss! मग लगेच डाव्या हातातील हातोड्याचा घाव खडकावर घातला. टण्णssssssss! दोन्हा हातोडे जणू काही एकाच वेळी खडकावर घाव घालत आहेत, असे वाटले.

टण्णssssssss! टण्णssssssss!

टण्णssssssss! टण्णssssssss!



खडकातून एवढी धूळ आणि दगडाचे तुकडे उडू लागले की जॉन हेन्री त्यात दिसेनासा झाला. पण त्याच्या हातोड्याचा आवाज मात्र ऐकू येत होता.

टण्णssssssss! टण्णssssssss!

त्याच्या हातोड्याच्या तालावर हवा जणू काही नाचत होती. मजुरांच्या प्रमुखाचे डोळे विस्फारले. तोंड आ वासून तो बघू लागला. त्याने बोटाने आभाळाकडे निर्देश केला.

खडकाच्या वर हवेत एक इंद्रधनुष्य दिसत होते. जॉन हेन्री इतक्या वेगाने हातोडे फिरवत होता की त्याच्या खांद्यांच्यावर इंद्रधनुष्य बनले होते. हवेतील धुरळ्यामध्ये ते चमकत होते, झगमगत होते. जणू काही आशेचा किरणच होते ते. जॉन हेन्री गाऊ लागला:

एक इंद्रधनुष्य आहे मजपाशी
टण्णssssssss! टण्णssssssss!
दोन्ही खांद्यांना बिलगलेले
टण्णssssssss! टण्णssssssss!
पण पर्जन्यराजा बरसणार नाही
पर्जन्यराजा बरसणार नाही
टण्णssssssss! टण्णssssssss!



जॉन हेन्री गात राहीला आणि खडकावर हातोड्याचे घाव घालत राहीला आणि हवा नाचत राहीली आणि इंद्रधनुष्य चमकू लागले आणि धरणी कापू लागली, थरथरू लागली. अखेरीस, नीरव शांतता पसरली. हळूहळू धुरळा खाली बसला.

लोकांचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. खडक गायब झाला होता. त्याच्या जागी एक छान सपाट रस्ता दिसत होता. असा रस्ता त्यांनी पूर्वी कधी पाहिला नव्हता. जॉन हेन्रीने खडकाला चक्काचूर करून टाकले आणि वर रस्ताही बांधून टाकला.

हा नवा रस्ता दूर पुढे मुख्य रस्त्याला मिळत होता. तिथे जॉन हेन्री उभा होता, मजुरांकडे बघत, हात हलवत, निरोप घेत. त्याच्या दोन्ही खांद्यांवर एक-एक हातोडा होता आणि खांद्यांभोवती इंद्रधनुष्य बिलगले होते.



जॉन हेन्री पुढे चालू लागला. वेस्ट व्हर्जिनिया राज्यात *चेसापीक* आणि *ओहायो* या ठिकाणांना रेल्वेमार्गाने जोडण्याचे मोठे काम सुरू होते. हातोडा चालवण्याचे उत्तम कौशल्य असलेल्या कारागिरांना तिथे काम मिळत होते. जॉन हेन्री खरंतर तिथेच जात होता. पण वाटेत भलामोठा खडक फोडून रस्ता बनवण्यासाठी तो थांबला.

पुढच्याच दिवशी जॉन हेन्री तिथे पोहोचला. पण रेल्वेमार्ग बनवण्याचे काम थांबले होते. रेल्वेमार्ग एका पर्वतातून जाणार होता. या पर्वतासमोर जॉन हेन्रीसुद्धा खुजा वाटत होता.

पण एका मजुराने जॉन हेन्रीला एका नव्या यंत्राबद्दल सांगितले. पर्वतातून बोगदा खणण्यासाठी ते हे यंत्र वापरणार होते. या यंत्राला *स्टीम ड्रील (वाफेवर चालणारे भोक पाडण्याचे यंत्र)* म्हणत. "हे यंत्र दहा माणसांपेक्षाही जास्त ताकदीने आणि वेगाने घाव घालू शकते. त्याला आरामाचीही गरज नसते."

पुढच्या दिवशी मजुरांचा प्रमुख स्टीम ड्रील घेऊन आला. जॉन हेन्री त्याला म्हणाला, "आपण शर्यत लावू. स्टीम ड्रील आणि माझ्यामध्ये."

प्रमुख हसू लागला. "जॉन हेन्री, तुझ्या कामाच्या उत्कृष्ट कौशल्याबद्दल खूप ऐकलंय. पण तू या यंत्रावर मात करू शकत नाहीस."

"बघू तर खरं," जॉन हेन्री म्हणाला.

प्रमुखाने खांदे उडवले. "ठीकाय, माझी काहीच हरकत नाही. तू डोंगराच्या मागल्या बाजूने खोदायला सुरुवात कर. मी स्टीम ड्रीलने पुढल्या बाजूने खोदतो. जो कुणी खोदत खोदत डोंगराच्या मध्यावर पहिल्यांदा पोहोचेल, तो जिंकला."





पुढच्या दिवशी सकाळी सारे काही शांत शांत होते. पक्ष्यांनी किलबिलाट केला नाही की कोंबडा आरवला नाही. त्यामुळे सूर्याला काही गडबड असल्याचे जाणवले. मग तो काही वेळ अगोदरच उगवला.

सूर्याने मनातील क्लेश भावनांइतकाच विशाल असलेला पर्वत पाहिला. त्याच्या एका बाजूला एक यंत्र होते. त्याला बरेच पाईप जोडले होते. यंत्र धूर आणि वाफ ओकत होते. यंत्र पर्वतावर घाव घालू लागले. धूळ, दगडाचे तुकडे आणि झुडपे हवेत उडून दूर पडू लागली. पर्वताच्या मागील बाजूस जॉन हेन्री उभा होता, एक अशक्यप्राय उद्दिष्ट घेऊन. त्यावेळी जॉन  हेन्री आपल्या उद्दिष्टाच्या तुलनेत फारसा मोठा वाटत नव्हता.

त्याच्या दोन्ही हातांत वीस-वीस पौंडांचे हातोडे होते. त्याचे स्नायू त्याच्या शहाणपणाइतकेच बळकट होते. त्याने हातोडे हवेत फिरवले तेव्हा ते चांदीसारखे चमकू लागले. हातोडे खडकावर आदळले तेव्हा सोन्यासारखे टणत्कार निघू लागले. प्रत्येक घावाबरोबर आगीच्या ज्वाळा निघू लागल्या.

पर्वताच्या पुढल्या बाजूस स्टीम ड्रील चालवणाऱ्या मजुरांच्या प्रमुखाला पर्वत थरथरत असल्याचे जाणवले. भीतीने तो ओरडला, “दरड कोसळतेय वाटतं.”

बोगद्यातील काळोखातून आवाज आला, “नाही, नाही, माझे हातोडे हवा हवेतून फिरतायत, त्याचा आवाज येतोय.” बोगद्यात इंद्रधनुष्याला जागा नव्हती. म्हणून, ते जॉन हेन्रीच्या बाजूस असलेल्या पर्वताच्या भागाला बिलगले.





रात्रभर जॉन हेन्री आणि स्टीम ड्रील काम करत राहिले. जॉन हेन्रीच्या हातोड्याच्या घावांमुळे बोगद्यातून आगीच्या ज्वाळा बाहेर येत होत्या. त्याच्या उजेडात लोकांना पर्वताला शालीसारखे लपेटून बसलेले इंद्रधुनष्य दिसले.

पुढच्या दिवशी सूर्य अंमळ लवकरच उगवला, कोण जिंकले ते पाहायला. सूर्योदय झाल्याझाल्या जॉन हेन्री खडक फोडून स्टीम ड्रीलसमोर उभा ठाकला. मजुरांचा प्रमुख स्तंभित होऊन त्याच्याकडे पाहातच राहीला. जॉन हेन्रीने सव्वा मैल लांब बोगदा खोदला होता. स्टीम ड्रील मात्र केवळ पाव मैलच बोगदा खोदू शकले होते.



लोक जयजयकार करू लागले, किंचाळू लागले, "जॉन हेन्री! जॉन हेन्री!"

जॉन हेन्री बोगद्यातून बाहेर उजेडात आला. त्याने आपले हात डोक्याच्या वर नेले. त्याच्या दोन्ही हातांत एक-एक हातोडा होता. इंद्रधनुष्य पर्वत सोडून पुन्हा त्याच्या खांद्याला बिलगले.

मंदपणे हसत जॉन हेन्रीने आपले डोळे बंद केले आणि हळूहळू तो जमिनीवर आडवा पडला. जॉन हेन्री मृत्यू पावला होता. कित्येक तास वेगाने आणि ताकदीने हातोडे चालवल्यामुळे त्याचे विशाल हृदय फाटले होते.

सगळे मिनिटभर शांत झाले. मग हळूच रडण्याचा आवाज आला. कुणीतरी म्हणाले की हा आवाज चंद्राकडून आला. दुसरे कुणी म्हणाले की त्याने सूर्याला अश्रू ढाळताना पाहिले.



मग एक अद्भुत घटना घडली. इंद्रधनुष्य काहीतरी पुटपुटले. लोक शपथेवर म्हणू लागले. खरं काही मला माहीत नाही. ते पुटपुटणे असो की विचार, पण एकाच वेळी ते सर्वांना जाणवले, हे खरे. “मृत्यू ही फार महत्त्वपूर्ण बाब नाही. प्रत्येकजण कधी ना कधी मृत्यू पावतो. तुम्ही कसे जगलात, हेच खरंतर महत्त्वपूर्ण आहे.”

एका व्यक्तिने टाळ्या वाजवल्या. नंतर दुसऱ्याने आणि मग तिसऱ्याने टाळ्या वाजवल्या आणि शेवटी प्रत्येकजण टाळ्या वाजवू लागला.

पुढच्या दिवशी सकाळी जॉन हेन्रीचा निरोप घेण्यासाठी सूर्याने सर्वांना लवकर जागे केले. लोकांनी जॉन हेन्रीचे शव रेल्वेच्या डब्यात ठेवले. रेल्वे सावकाश पर्वतातून मार्गक्रमण करू लागली. रेल्वेमार्गाच्या दोन्ही बाजूंना लोक गर्दी करून उभे राहीले. त्यांच्या डोळ्यांत अश्रू आले. ते मोठमोठ्याने जयजयकार करू लागले,

“जॉन हेन्री! जॉन हेन्री!”

जॉन हेन्रीचे शव वॉशिंग्टन डी. सी. येथे नेण्यात आले.



काही लोक म्हणतात की अध्यक्ष आणि त्यांच्या पत्नी झोपी गेले तेव्हा जॉन हेन्रीचे शव व्हाइट हाऊसच्या पटांगणात दफन करण्यात आले.

मला याबद्दल काही माहीत नाही. एवढंच माहीत आहे: लोक म्हणतात, तुम्ही मध्यरात्रीच्या सुमारास व्हाइट हाऊसजवळून जाताना तिथे शांतपणे उभे राहिलात, लक्षपूर्वक ऐकलंत तर कदाचित तुम्हाला गंभीर आवाजात एक गीत ऐकू येईल:

एक इंद्रधनुष्य आहे मजपाशी
टण्णssssssss! टण्णssssssss!
दोन्ही खांद्यांना बिलगलेले
टण्णssssssss! टण्णssssssss!
पण पर्जन्यराजा बरसणार नाही
पर्जन्यराजा बरसणार नाही
टण्णssssssss! टण्णssssssss!

समाप्त